कृषि आयुक्तालयांतर्गत तालुका बीज गुणन केंद्रामधील अस्थायी पदे दिनांक १.०९.२०२० पासून दिनांक २८.२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत . (एकूण २४८ पदे)

# महाराष्ट्र शासन

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांक: ताबीके २०१९/प्र.क्र.५८/१३अे

मंत्रालय विस्तार, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०४ सप्टेंबर, २०२०.

**वाचा**:-

१. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.४ ऑक्टोबर २००४
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक आकृवि-१२०८/प्र.क्र.७२/१५-अे, दि.२२/०५/ २००९.
३. कृषि व पदुम विभाग, शासन शुध्दीपत्र क्रमांक आकृवि-१२०९/प्र.क्र.४०१/१५-अे, दि.३०/०६/२०११
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक ताबिके २०१९/प्र.क्र.५८/१३ अे, दि.४/१०/२०१९
५. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ ११११/साप्र/०२६१/२०-२१/प्र.क्र.-५/आस्था-५(निप)/१९३०६, दि.१७/८/२०२०
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ३१/८/२०२०.

**प्रस्तावना** :-

कृषि विभागातील सन २०२०-२१ मधील एकूण २४८ अस्थायी पदांना शासन निर्णय क्रमांक ताबिके २०१९/प्र.क्र.५८/१३ अे, दि.३ मार्च २०२० अन्वये दिनांक ३१.८. २०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली होती.

वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांच्या त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना, तसेच, या पूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ३१.८.२०२० नंतर मुदतवाढ देण्याचे अधिकार दिलेले आहेत. यास अनुसरुन सदर अस्थायी पदांना दिनांक १.९.२०२० पासून दिनांक २८.२.२०२१ या कालावधीपर्यंत पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :-

कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र.५ येथील पत्राच्या विनंती वरुन तालुका बिजगुणन प्रक्षेत्र (२४०१ ०२६१) या योजनेमधील **२४८ अस्थायी पदे**, (६ महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त असलेली पदे वगळून), दिनांक १.९.२०२० पासून दिनांक २८.२.२०२१ पर्यंत खालील अस्थायी पदांना पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**तालुका बीजगुणन प्रक्षेत्रे (२४०१ ०२६१)**

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदे |
|---|---|---|
| १ | कृषि अधिकारी (वर्ग-२)(कनिष्ठ) | २२ |
| २ | कृषि सहाय्यक (वर्ग-३) | ८२ |
| ३ | शिपाई/ रखवालदार (वर्ग-४) | १४२ |
| ४ | टिलर ऑपरेटर (वर्ग-४) | ०२ |
| | **एकूण** | **२४८** |

२. या पदासाठी येणारा खर्च मागणी क्रमांक डी-३, २४०१-पीक संवर्धन, १०३-बी-बियाणे, १०३ (००) (०१) तालुका बीज गुणन प्रक्षेत्रे (२४०१ ०२६१) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२०-२१ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/ २००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४ ऑक्टोबर, २००४, तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०४१३३८४९९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.09.04 13:43:02 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सर्व संचालक/ सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५. सर्व विभागीय कृषि सह संचालक.
६.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
९. सह संचालक, लेखा व कोषगारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय इमारत,५ वा मजला, मुंबई-३२
१०. कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प /१५ अे / पदुम-१६,कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती/कार्यासन १३ अे.